"डिजीटल इंडिया भूमि अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रमातंर्गत भूमापन नकाशांचे डिजीटायझेशन प्रकल्पासाठी उर्वरित ८०% निधी मिळणेबाबत."

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : राभूअ-२०१९/प्र.क्र.१५९/ल-१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक: ०४ नोव्हेंबर, २०१९

वाचा:-

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक: संकीर्ण १०११/२१०३/प्र.क्र.६१८/ल-१, दिनांक ०६/१०/२०१५
२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक: राभूअ-२०१६/प्र.क्र.९९/ल-१, दिनांक ३१/०३/२०१७
३) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक: राभूअ-२०१६/प्र.क्र. ३०३/ल-१, दिनांक २७/०३/२०१८
४) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक: अर्थसं-२०१९/प्र.क्र. ९२/अर्थ-३, दिनांक ०८/०७/२०१९
५) जमाबंदी आयुक्त, पुणे यांचेकडील क्र. पु.मो.१/प्र.क्र.६८/२०१९, दि. ०२/०५/२०१९ चा प्रस्ताव.

प्रस्तावना-

राज्यातील भूमापन नकाशांचे डिजीटायझेशन करण्यास संदर्भिय क्र.१ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. पहिल्या टप्प्यात पुणे, रायगड, नाशिक, औरंगाबाद, अमरावती व नागपूर या जिल्ह्यातील भूमापन नकाशांचे डिजीटायझेशनचे काम खाजगी संस्थेमार्फत सुरु करण्यात आले असून, यासाठी एकुण रु.३५.७२ कोटी खर्चास संदर्भिय क्र.२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

राज्यातील भूमापन नकाशांचे डिजीटायझेशन प्रकल्पातील पहिल्या टप्प्यातील स्कॅनिंग कामाचा खर्च भागविणेसाठी रु.६.४३ कोटी निधी संदर्भिय क्र.३ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेला आहे. आता डिजीटायझेशनचे काम अंतिम टप्प्यात असून ऑक्टोबर, २०१९ अखेर पुर्ण होणे अपेक्षित आहे. सदर कामाचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

**टिपणांव्यतिरिक्त इतर नकाशांकरिता निधी मागणीचा तपशील**

| अ. क्र. | जिल्हा | इतर नकाशे पॉलीगॉनची संख्या | खाजगी संस्थेचा दर रु. प्रति पॉलीगॉन | एकुण आवश्यक निधी (रु. कोटीमध्ये) | पैकी वितरित केलेला २०% निधी (रु. कोटीमध्ये) | उर्वरित निधी मागणी (रु. कोटीमध्ये) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | पुणे | २४,२३,२०९ | २४.७५ | ६.०० | १.९० | ४.१० |
| २ | रायगड | १७,६३,६७१ | २४.७५ | ४.३७ | १.८३ | २.५४ |
| ३ | नाशिक | १३,५०,६०१ | २७.७५ | ३.७५ | ०.८६ | २.८९ |
| ४ | औरंगाबाद | ६,२८,८५२ | २९.५० | १.८६ | ०.६४ | १.२२ |
| ५ | अमरावती | ७,१०,३१८ | २९.५० | २.१० | ०.५४ | १.५६ |
| ६ | नागपूर | १०,६४,९१८ | २७.५० | २.९३ | ०.७६ | २.१७ |
| | **एकूण** | **७९,४१,५६९** | | **२०.९९** | **६.४३** | **१४.५६** |

उपरोक्त तक्त्यातील रकाना क्र.३ मध्ये नमूद टिपण व्यतिरिक्त इतर नकाशांची पॉलीगॉनची संख्या एकुण ७९,४१,५६९ आहे. खाजगी संस्थेने दिलेल्या प्रति पॉलीगॉन दरानुसार एकुण अंदाजे खर्च रु.२०.९९ कोटी होणे अपेक्षित असून त्यापैकी डिजीटायझेशन कामाच्या पहिल्या टप्प्यातील स्कॅनिंग कामाचा २०% खर्च भागविण्याकरिता रु.६.४३ कोटी निधीमधून खाजगी संस्थांना २०% स्कॅनिंग कामाची देयके अदा करण्यात आलेली आहेत.

२. आता, खाजगी संस्थेने दिलेल्या प्रति पॉलीगॉन दरानुसार एकुण अंदाजे खर्च रु.२०.९९ कोटी पैकी रु. ६.४३ कोटी वगळता रु. १४.५६ कोटीची तसेच टिपण नकाशांचे डिजीटायझेशन करण्यासाठी केंद्र शासनाकडून १००% निधी उपलब्ध होणे अपेक्षित आहे. तथापि, दि.२९/१२/२००८ च्या केंद्र शासनाकडील पत्रान्वये पुणे, सिंधुदुर्ग, नाशिक, लातूर, बुलडाणा व नागपूर या ६ जिल्ह्यांना मंजूरी देण्यात आलेली असून रु. १०/- प्रति FMB दर मंजूर केलेला आहे. केंद्र शासनाच्या दि.३०/११/२०१७ च्या पत्रानुसार पुणे, नाशिक व नागपूर या तीन जिल्ह्यांना मंजूरी असून केंद्र शासनाने मंजूर केलेल्या दरापेक्षा होणारा अधिकचा खर्च राज्य शासनाने करण्याबाबत नमूद केलेले आहे. त्याअनुषंगाने ४ जिल्ह्यातील सुधारित पॉलीगॉनच्या गणनेनुसार टिपण नकाशांकरिता होणा-या अधिक खर्चाचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| **सुधारित गणनेनुसार टिपण नकाशांसाठी आवश्यक निधीबाबतचा तपशील** | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र | जिल्हा | सुधारित गणनेनुसार टिपणांची संख्या | खाजगी संस्थेचा दर रु. प्रति पॉलीगॉन | एकुण खर्च (रु. कोटीमध्ये) | पैकी केंद्र शासनाकडून उपलब्ध होणारा निधी रु. १०/- प्रति पॉलीगॉन प्रमाणे (रु. कोटीमध्ये) | राज्य शासनाकडून आवश्यक निधी (रु. कोटीमध्ये) |
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** |
| १ | पुणे | ३०८९६५ | २४.७५ | ०.७६ | ०.३१ | ०.४६ |
| २ | नाशिक | २९१६०९ | २७.७५ | ०.८१ | ०.२९ | ०.५२ |
| ३ | औरंगाबाद | २२६१२५ | २९.५० | ०.६७ | ०.०० | ०.६७ |
| ४ | अमरावती | ३२४३८५ | २९.५० | ०.९६ | ०.०० | ०.९६ |
| | **एकुण** | **११५१०८४** | | **३.२०** | **०.६०** | **२.६०** |

राज्यातील एकूण ६ जिल्ह्यांच्या भूमापन नकाशांच्या डिजीटायझेशनसाठी उपरोक्त ४ जिल्हे वगळता रायगड जिल्ह्यातील टिपण नकाशांचे डिजीटायझेशन करणे आवश्यक नसल्याबाबतचा उपसंचालक भूमि अभिलेख, कोकण प्रदेश, मुंबई यांचा अहवाल तसेच, नागपूर जिल्ह्यात टिपण उपलब्ध नसल्याने, रायगड व नागपूर हे दोन जिल्हे वगळण्यात आले आहेत. त्यानुसार, उपरोक्त तक्त्यातील नमूद ४ जिल्ह्यातील टिपण

नकाशांची पॉलीगॉनची संख्या एकुण ११,५१,०८४ असून खाजगी संस्थेने दिलेल्या प्रति पॉलीगॉन दरानुसार एकुण अंदाजे खर्च रु.३.२० कोटी होणे अपेक्षित आहे.

३. केंद्र शासनाने मंजूर केलेल्या पुणे व नाशिक या दोन जिल्ह्यातील टिपण नकाशांसाठी रु.१०/- प्रति पॉलीगॉन प्रमाणे एकुण रु.६०.०० लाख खर्च होणे अपेक्षित असून केंद्र शासनाने सन २००९-१० अखेर उपलब्ध करुन दिलेल्या निधीपैकी रु.७१.११ लाख निधी जमाबंदी आयुक्त, पुणे यांचेकडे शिल्लक आहे. तथापि, खाजगी संस्थेने दिलेल्या दरानुसार पुणे व नाशिक या दोन जिल्ह्यांतील टिपण नकाशांसाठी एकुण रु.१.५७ कोटी खर्च होणे अपेक्षित असून त्यापैकी केंद्र शासनाकडून उपलब्ध होणारे रु.०.६० कोटी वगळता रु.०.९७ कोटी निधी राज्य शासनाकडून उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. तसेच, उर्वरित औरंगाबाद व अमरावती या दोन जिल्ह्यातील टिपण नकाशांचे डिजीटायझेशन करण्याकरिता राज्य शासनाकडून १००% निधी हा रु.१.६३ कोटी इतकाआहे, असे एकूण रू.२.६० कोटी निधीची आवश्यकता आहे.

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेऊन राज्यातील ६ जिल्ह्यातील इतर नकाशांचे डिजीटायझेशन करण्याकरिता रु.१४.५६ कोटी व टिपण नकाशांकरिता एकुण रु.२.६० कोटी असे एकुण रु.१७.१६ कोटी निधी “राज्य शासन पूरक अनूदान” लेखाशिर्ष २०२९०८८८ अंतर्गत उपलब्ध असलेल्या निधीचा विनियोग करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय-</u>**

राज्यातील भूमापन नकाशांच्या डिजीटायझेशनच्या पहिल्या टप्प्यासाठी स्कॅनिंग व डिजीटायझेशनचा खर्च भागविण्यासाठी रू.१७,१६,००,०००/-(रूपये सतरा कोटी सोळा लाख फक्त) इतकी रक्कम उपरोक्त प्रस्तावनेतील तक्त्यात नमुद केल्यानुसार वितरीत करण्यास खालील अटींच्या अधीन राहून याव्दारे मान्यता देण्यात येत आहे:-

१.राज्यातील भूमापन नकाशांच्या डिजीटायझेशनच्या पहिल्या टप्प्यासाठी स्कॅनिंग व डिजीटायझेशनचा खर्च भागविण्यासाठी रू.१७.१६ कोटी वितरीत निधी एकरक्कमी काढून महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्थेच्या बचत खात्यात ठेवू नये तसेच सदर निधी खाजगी संस्थेकडून प्राप्त होणाऱ्या देयकानुसारच आहरित करून खर्च करण्यात यावा.

२.जिल्हास्तरावर वर्षअखेर कोणताही निधी अखर्चित राहणार नाही. मागील आर्थिक वर्षातील व चालू आर्थिक वर्षातील वितरीत निधी अखर्चित राहिल्यास तो दि. ३१/०३/२०२० रोजी शासनास समर्पित करणे आवश्यक आहे.

३.सदर खर्च करताना वित्त विभागाचे निधी वितरणाचे परिपत्रक दि. ०८/०७/२०१९ मधील तरतुदीनुसार तसेच शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनानुसार कार्यवाही करणे आवश्यक राहिल.

४.यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. सी.१, २०२९ जमीन महसुल १०२, सर्व्हेक्षण व जमाबंदीची कामे, (००) (११) जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख (महाराष्ट्र राज्य), राष्ट्रीय भूमी अभिलेख आधुनिकीकरण कार्यक्रम (रा.भू.अ.आ.का.) (डिजिटायझेशन) २०२९०८८८ (१०) कंत्राटी सेवा (योजनातंर्गत)" या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षात मंजुर अनुदानातुन खर्ची टाकण्यात यावा.

५.जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म. राज्य), पुणे यांनी सदर निधी आहरीत करून संबंधित संस्थांना देयके अदा करण्याची कार्यवाही त्वरीत करावी. प्रस्तुत निधीबाबत आर्थिक व भौतिक अहवाल उपयोगिता प्रमाणपत्रासह शासनास पाठवावा.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९११०४१२२४१०१११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2019.11.04 12:27:18 +05'30'

**( डॉ. संतोष भोगले )**
**सह सचिव**
**महसूल व वन विभाग**

**प्रत –**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
४. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
५. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव.
६. अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
७. सर्व विभागीय आयुक्त
८. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. सर्व जिल्हाधिकारी.
१०. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
१२. कोषागार अधिकार, पुणे
१३. वित्त विभाग, कार्यासन क्र. व्यय १०/अर्थसंकल्प ६, मंत्रालय, मुंबई
१४. माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती प्रसिध्दीकरीता)
१६. निवड नस्ती, ल-१.